

# इवान

## एका शॉपिंग मॉल गोरील्याची खरी कहाणी

कैथरीन एप्पलगेट

मराठी : अश्विनी बर्वे

मार्मिक शब्द आणि विचारोत्तेजक चित्रांमध्ये, न्यूबेरी मेडल विजेता (कॅथरीन ॲपलगेट) आणि कलाकार ब्रायन कारस यांनी एका विशेष गोरिल्याचे असाधारण वास्तविक पद्धतीने विवरण केले आहे.

एका मुलाच्या रुपात कैद करून आणलेल्या इवान गोरिल्याला अमेरिकेला आणले गेले होते आणि त्याचे काम एका शॉपिंग मॉलमध्ये आलेल्या ग्राहकांना आकर्षित करण्याचे होते. काही वर्षानंतर लोकांना गोरिल्याच्या बाबत जिज्ञासा, दया,आणि त्याच्यावर काही इलाज करावे वाटू लागले, शेवटी तर लोक म्हणू लागले की, त्या कोमल प्राण्याला एक चांगले जीवन मिळायला पाहिजे, यासाठी त्यांनी मॉलच्या लोकांवर दबाव टाकला.

कांगोहून  अमेरिकेपर्यंत, आणि एका स्थानिक शॉपिंग मॉलच्या आकर्षणापासून पशु कल्याणचे राष्ट्रीय प्रतिकापर्यंत, "इवान द शॉपिंग मॉल गोरिला" ने अनेक मैलाचे अंतर आश्चर्यकारकरित्या पार केले.

यह उसकी सच्ची कहानी है.

# इवान

## एक शॉपिंग मॉल गोरिल्याची खरी कहाणी

कैथरीन एप्पलगेट
चित्र: ब्रायन कारस






गर्द झाडांच्या पानांच्या शांत
जागेत, कोमल कुशीत त्या
गोरिल्याचे जीवन सुरु झाले होते.



मुलाचा जन्म मध्य-आफ्रिकेच्या एका गरम जंगलात झाला होता. तो पश्चिमेच्या पठारावरील गोरिलाच्या एका मोठ्या परिवाराचा हिस्सा होता.

त्याच्या समुहात मुले, किशोर, स्त्रिया आणि एक पुरुष नेता – सिल्वरबैकपण सामील होते.



बाळ गोरिला जस जसा मोठा होवू लागला तस तसा तो अधिक खेळू लागला. जेवढा तो अधिक खेळू लागला तसा तो अधिक शिकू लागला.

तो आपल्या आईच्या पाठीवर बसत असे. त्याने आपल्या आईच्या हूटिंगचा आवाज आणि त्याच्या छातीचे ठोके ऐकले.

त्याने वयस्कर गोरिल्याची चतुरता आणि वेगाला जवळून बघितले. ते कुस्ती खेळत असे आणि वेलीवरून एक-दुसऱ्याचा पाठलाग करत असत आणि झोके घेत असत.

तो माणसांच्याबाबत काही
शिकण्यापूर्वी उशीर झाला
होता.

शिकाऱ्यांनी वेगवान बंदुका आणि क्रूर हातानी त्या
छोट्या गोरिल्याला आणि एका दुसऱ्या पिल्लाला पळवले.





हजारों मैलाचा न संपणारा प्रवास
केल्यानंतर त्याच्या काळ्या, नरम
खोक्यात शेवटी एक वाऱ्याची
हलकीशी झुळूक आली.



हिरवेगार जंगल आता खूप दूर राहिले होते.

दोन गोरिल्यांनी अर्ध्या जग फिरून टैकोमा, वाशिंगटनपर्यंत प्रवास केला होता. एक माणूस जो शॉपिंग मॉलचा मालक होता, त्याने दोन गोरिल्यांची ऑर्डर दिली होती आणि त्यांना अशाच पद्धतीने खरेदी केले जसे कोणी पिझ्झा किंवा बुटाचे जोड खरेदी करत असत.





लोक त्या दोन गोरील्यांना बघून हसत असत आणि त्यांना स्पर्श करण्याचा प्रयत्न करत असत.



दोन गोरिल्यांना माणसांचे कपडे घातले गेले आणि त्यांना माणसांसारखे अन्न खायला दिले.



शॉपिंग मॉलच्या मालकाने “गोरील्यांचे बारसे” ठेवून नावासाठी स्पर्धा आयोजित केली.

जी नावे निवडली गेली ती नावे होती - बर्मा आणि  इवान.

गोरिला या अजब नवीन जगात आल्यानंतर त्वरितच एका काळ्या दिवशी, त्यांच्यातला एक – बर्मा याचा मृत्यू झाला.

त्याच्याशिवाय, इवान अगदी एकटा पडला. त्याने शिकावयात अशा खूप गोष्टी होत्या.



जेव्हा तो छोटा होता,
तेव्हा इवान खूप प्गोड
दिसत होता.

तीन वर्षापर्यंत तो एका
माणसाच्या मुलासारखे
घरातच राहिला.





तो एका अंथरुणावर
झोपत असे आणि
बेसबॉल सारखे खेळ
बघत असे.



त्याला मुले कडेवर घेत आणि तो
मोटरसायकलवर प्रवास करत असे.





त्याला अशा सगळ्या गोष्टी शिकाव्या लागल्या ज्याची त्याला जंगलात कधीच गरज पडली नसती.

इवानला एक गोष्ट शिकण्याची अजिबात गरज पडली नाही - ती म्हणजे खाण्याची.

जेवढे अधिक त्याने खाल्ले, तेवढी अधिक त्याची वाढ झाली.

जेवढा अधिक मोठा झाला, तेवढा कमी वेळ त्याला लोकांच्या घरात राहावे लागले.



मग शॉपिंग मॉलमधला एक पिंजरा
इवानचे नवीन घर झाले. पण तिथे
करण्यासारखे त्याच्याकडे काहीच नव्हते.



कधी –कधी इवान
टिव्ही बघत असे.

कधी–कधी तो एका जुन्या
टायरशी खेळत असे.





कधी–कधी तो बोटाने
काहीतरी रंगवी, आणि
कागदावर आपल्या अंगठा
उमटवत सही करे.

अधिकांश वेळा त्याला लोक
आपल्याकडे टक लावून
बघतांना दिसत.







इवान जवळपास तेरावर्षाचा होता तेव्हा त्याचा कोट, चांदीच्या रंगासारखा पांढऱ्या धाग्यांनी चकमकू लागला..

आता तो एक सिल्वरबैक गोरिला झाला होता.

या वयात तो जंगलात आपल्या परिवाराचे रक्षण करण्यासाठी एकदम तयार झाला असता.

पण इथे त्याने सुरक्षा करावी असा कोणताच परिवार नव्हता.



अशा प्रकारे वर्षानुवर्षे
निघून गेली.

इवानचे एकाकी जीवन
बघून लोकांना राग येऊ
लागला. मुलांनी आणि
वयस्कर लोकांनी पत्रं
लिहिली. याचिकेवर सह्या
घेतल्या आणि विरोध
करण्यास सुरुवात केली.

दुसऱ्या ठिकाणी पाठवण्याच्या आधी इवान सत्तावीस वर्षापर्यंत इतर गोरिल्यांच्या सोबतीशिवाय आपल्या पिंजऱ्यात शॉपिंग मॉलमध्ये राहिला.




पण आता तो चांगल्या हातात होता.

अटलांटाचे प्राणीसंग्रहालयात काही जंगल नव्हते.

ते भिंतीचे ठिकाण होते. तरीही तिथली हवा आपल्या बरोबर जंगलातले आवाज आणि सुगंध घेऊन येत होती.

गोरिलांच्या गरजा समजणारे वैज्ञानिकांनी हळूहळू सावधपणे इवानला आपल्या नव्या जीवनात मिळून-मिसळून राहण्यास मदत केली.





शेवटी, इवानच्या जाण्याची वेळ आली. इवान त्यासाठी तयार होता का? कॅमेरे क्लिक झाले. पत्रकारांनी त्याच्याकडे लक्षपूर्वक पाहिले.





जेव्हा इवानने थंड हिरव्या घासावर पाय ठेवला, तेव्हा त्याच्या केसाळ अंगावर सूर्याची किरणे पडली आणि ते चमकू लागले. त्याला बघून लोक आनंदाने नाचू लागले. काही लोक हसू लागले तर काहींना रडू आले.

इवान, शॉपिंग मॉलमधला गोरिला, शेवटी झाडांच्या आणि गवत असणाऱ्या ठिकाणी इतर गोरिल्यांच्या बरोबर राहू लागला.

पानाच्या गार शांततेत, कोमल कुशीत त्या गोरिल्याने एका नवीन जीवनास परत सुरुवात केली.





# इवानच्या बाबत

इवानचे प्रारंभिक जीवनाची माहिती चांगल्या पद्धतीने नोंदवली गेली नाही, पण जेवढे आम्हांला माहीत आहे, इवानचा जन्म १९६२ मध्ये कांगोत लोकतांत्रिक गणराज्य मध्ये झाला होता. तो जेव्हा जेमतेम सहा महिन्यांचा होता तेव्हा त्याला अशा शिकाऱ्यांनी पकडले जे अवैध पद्धतीने प्राण्यांना पकडत असत आणि नेहमी त्यांना मारून टाकत असत.

इवानच्या परिवाराबरोबर काय झाले माहीत नाही, पण त्याच्याबरोबर एक मादी गोरिला पकडली होती,जी इवानच्या जमावातील एका दुसऱ्या आईचे पिल्लू होते. गोरिल्यांच्या दोन पिल्लांना टैकोमामध्ये बी-ॲण्ड-आय सर्कस स्टोरमध्ये पाठवले गेले. ते एक शॉपिंग सेंटर होते जिथे नेहमी ग्राहकांना आकर्षित करण्यासाठी हत्ती, सिल, आणि चिम्पाझीसहित इतर जंगली प्राण्यांना जंगलातून विस्थापित करून आणले जाई.



आपल्या नवीन दुकानाची जाहिरात करण्यासाठी बी ॲण्ड आय ने गोरिलांच्या पिल्लांचे नाव ठेवण्यासाठी एक स्पर्धा आयोजित केली, नावे 'बी' आणि 'आय'ने सुरु होणे गरजेचे होते. विजेत्याला पाचशे डॉलर मिळाले.

छोटी मादी गोरिला - बर्मा, संयुक्त राज्य अमेरिकेत आल्यानंतर काहीच दिवसात मेली. पण इवान वाचला. पुढकी तीन वर्षे तो अशा कुटुंबाच्या घरात राहिला, जे बी-ॲण्ड-आय शॉपिंग मॉलमध्ये पाळीव प्राण्याचे दुकान चालवत असे. तिथे राहत असतांना इवान अगदी माणसांसारखा राहत होता. त्याला तळलेले चिकन खाणे आणि पडद्यावर झोके घेणे आवडत असे.



पाच वर्षाचा झाल्यावर त्याला घरी सांभाळणे अवघड झाले होते तेव्हा इवानला बी-ॲण्ड-आय शॉपिंग मॉलमध्ये एका खोलीत ठेवले. मग इवानने आपला अधिकांश काळ एका छोट्या १४ फुटच्या सिमेंटच्या खोलीत घालवला. तो लवकरच लोकप्रिय झाला आणि लोकांचे आकर्षण वाढले. आणि एक शॉपिंग मॉल गोरिल्याच्या नावाने ओळखले जाऊ लागले.

इवानला दिवसभर खूप कमी काम होते, खरेतर त्याला चित्र काढायला मजा वाटत होती, आणि तो नेहमी टिव्ही बघत असे. अनेक मुलं नियमित इवानकडे जात मोठी झाली होती. ते त्याच्या डोळ्यात बघत असत, ती आपल्या हातानी इवानच्या खिडकीवर दाब देत आणि त्याच्या उड्या मारण्याची वाट बघत असे.

सत्तावीस वर्षे इवानने एका पिंजऱ्यात काढले.याकाळात लोक जंगली प्राण्यांना बंदी करण्याच्या बाबत जागरूक झाले. त्याचा असा विचार होता की प्राण्यांना त्यांच्या नैसर्गिक वातावरणात राहणे गरजेचे आहे, जसेच त्यांना आपल्या प्रजाती प्राण्यांबरोबर राहणे आवश्यक आहे हे लोकांना समजू लागले होते.

१९९० मध्ये जेव्हा इवानची कहाणी *नेशनल जियोग्राफिक* डॉक्यूमेंट्री "द अर्बन गोरिला" मध्ये दाखवली गेली, तेव्हा त्याच्या दुर्दशेबद्दल लोकांना अधिक व्यापक रुपात समजले.

अनेक वर्तमानपत्रांनी त्याची कहाणी दिली, वास्तवात मला प्रथम १९९३ मध्ये इवानच्या बाबत *न्यूयॉर्क टाइम्समधल्या एका लेखाने कळले. ज्याचे शिर्षक होते* "गोरिला सल्क्स इन ए मॉल एज़ हिज फ्यूचर इज डिबेटिड."

इवानच्या स्थितीमुळे निराशा वाढली, काही स्थानिकांनी,मुलांनी आणि वयस्कर लोकांनी इवानच्या परिस्थितीबद्दल विरोध करण्यास सुरुवात केली .आणि बी-अॅण्ड-आय वर बहिष्कार घातला. इवानच्या समर्थकांनी “गोरिलाला मुक्त करा” अशी रॅली काढली. त्यांनी स्थानिक, राजकीय आणि राष्ट्रीय अधिकाऱ्यांना रागाने पत्रं लिहिली आणि त्यांनी ठरवले की इवानची कहाणी वर्तमानपत्रात व्यापक स्वरूपात यावी. एका अकरा वर्षाच्या पाचवीतली मुलीने “फ्री इवान” अशी याचिका केली आणि त्यावर १५०० लोकांच्या सह्या घेतल्या.

१९९४ मध्ये, सिएटलच्या वुडलैंड पार्क प्राणी संग्रहालयाच्या मदतीने इवानला अटलांटामध्ये स्थानांतरित केले गेले. तिथे एक प्रमुख सोय होती की जिथे नैसर्गिक अधिवासात देशातील सगळ्यात मोठ्या संख्येने गोरिला राहत होते.

इवानला हळूहळू आपल्या नवीन जीवनाची सवय झाली. आधीतर तो दुसऱ्या गोरीलांना घाबरत होता, पण हळूहळू तो त्यांच्याबरोबर मिसळला. इवानला मुले नव्हती. पण त्याला प्राणी संग्रहालयमधील किशोर गोरिल्यांबरोबर आणि मादांबरोबर खेळण्यात त्याला मजा वाटू लागली. पावसाळ्याबद्दलची नावड सर्व जगाला माहीत होती आणि तो आपल्या पायांना ओला घास लागू नये म्हणून नेहमी एक गोणी घेऊन फिरत असे. ज्या लोकांना तो माहीत होता, त्यांना तिथे तो आनंदी आणि समाधानी वाटला.

इवानचे २०१२ मध्ये पन्नासाव्या वर्षी निधन झाले. आता पकडलेला सगळ्यात जुना गोरिला ५२ वर्षाचा आहे, खरेतर जंगलात गोरिले साधारणपणे केवळ तीस वर्षापर्यंत जगतात. अटलांटातील प्राणी संग्रहालयाने आपल्या प्रिय सेलिब्रिटी गोरिल्यासाठी एक स्मारक सेवा आयोजित केली. ज्यात पूर्ण देशातील लोकांनी भाग घेतला. इवानला त्याच्या विचित्र व्यक्तित्व आणि आपल्याला सांभाळणाऱ्या बरोबर प्रेमपूर्ण सबंध ठेवण्याबरोबरच सगळ्या प्राण्यांबरोबर दयाळू व्यवहार करणारा म्हणून लक्षात ठेवले जाते.

आपल्या जीवनाची शेवटच्या वर्षात अटलांटा प्राणी संग्रहालयात इवानची मुख्य देखभाल करणारे जोडी कारिगन यांनी आपली आठवण सांगितली आहे.

इवान मागच्या दहा वर्षांपासून माझा सगळ्यात चांगला दोस्त होता,आणि मी अशा अनोख्या आणि अद्‌भुत प्राण्याची देखभाल केल्यामुळे एक उत्तम रक्षक झालो आहे. त्याने आम्हांला खूप प्रेम दिले आणि मला वाटते की अटलांटाच्या प्राणीसंग्रहालयात त्याने आमच्या बरोबर अठरा वर्षे जेवढी आनंदात घालवली तेवढाच आनंद आम्हांला त्याच्यामुळे झाला.

प्रत्येकवेळी जेव्हा मी इवानच्या बाबतीत विचार करतो तेव्हा मला हसू येते आणि मला आठवते की मला बघितल्यावर त्याला किती आनंद होत असे. खासकरून जेव्हा मला सकाळी कामावर येतांना बघून तो माझा आनंदाने स्वागत करते असे. तो खूप विनम्र आणि प्रेम करणारा प्राणी होता आणि तो नेहमी हसत असे.

इवानला पेंटिंग करायला खूप आवडे,जेव्हा मी त्याला पेंटिगचे सामान देई तेव्हा तो लवकर माझ्यासमोर येई आणि आनंदाने आवाज करत असे.मी त्याला अनेक रंग दाखवे आणि मग तो त्या रंगाकडे बोट दाखवे ज्याचा त्याला उपयोग करण्याची इच्छा असे.त्याच्या आवडीचा रंग लाल होता.मी तो कॅनवासवर ठेवा आणि त्याला ब्रश देत असे. पेंटिंग संपल्यावर तो ब्रश मला परत करत असे. फिनिशिंग टच केल्यावर तो नेहमी आपल्या बोटाचा ठसा उमटवून सही करे.

वाशिंगटन राज्यात इवानच्या चाहत्यांची संख्या मोठी होती.इवानचा चाहता वर्ग तेव्हा वाढला जेव्हा तो अटलांटाला आला. त्याने हजारो लोकांचे मन जिंकले आणि असा एकही दिवस जात नाही जेव्हा त्याची आठवण आली नाही.इवान जीवनाचे ते प्रतिक होता ज्याने समजते की प्राणी आपले जीवन कसे बदलवतात.आणि आपल्यालाही त्यांच्या जीवनाला आकार देण्याची शक्ती असते.



इवान द्वारा बनाई एक पेंटिंग